**Convertion in Regular Temparary Establishment:- Shri. Subhash N. Sapkal, working under Superintending Engineer, Beed Irrigation project Circle**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, श्री.सुभाष ना. सपकाळ, मजूर**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एसयुटी-२००४ /(१५४/०४) /आ (कामगार )

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांकः- ०५/१०/२०११

पहावेः-:१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रः- रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५, दिनांक २४.४.२००१.

२) अधिक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ यांचे पत्र क्रः-आस्था-४/रु.अ.आ/३९२०, दिनांक- २२.०७.२०११.

**प्रस्तावना** :-

पाटबंधारे विभाग,बीड अंतर्गत श्री.सुभाष नारायण सपकाळ हे सन १९७६ ते १९८९ दरम्यान रोजंदारी आस्थापनेवर मजूर पदी खंडीत स्वरुपात कार्यरत होते. त्यांचे कोणत्याही वर्षी सलग २४० दिवस काम पूर्ण झाले नव्हते. कामाअभावी श्री.सपकाळ यांना मार्च १९८२ पासून कामावरुन कमी करण्यात आले. त्यामुळे श्री.सपकाळ यांनी त्यांना पुन्हा कामावर घेण्यासाठी मा.कामगार न्यायालय,औरंगाबाद येथे रेफरन्स आयडीए नं.५६/८७ दाखल केले. न्यायालयाने दि.२०.७.१९९१ रोजी श्री.सपकाळ यांना दि-२४.३.८३ पासून सेवासातत्य व थकबाकीसह सेवेत पुनर्स्थापित करण्याचा निर्णय दिला. रेफ.आयडीए क्र.५६/८७ हे पुनर्स्थापित करण्यासाठी क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी पाच वर्षे विलंबाने दावा क्र.१०/९६ मा.कामगार न्यायालय,औरंगाबाद येथे दाखल केला. तथापि सदर विलंब क्षमापन व पुनर्स्थापनेचा अर्ज दि-२८.१.२००४ च्या आदेशान्वये फेटाळण्यात आला. मा.कामगार न्यायालय,औरंगाबाद यांच्या उपरोक्त दि.-२८.१.०४ च्या निर्णयाविरुध्द शासनाचे वतीने मा.उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्र.५००१/२००५ दाखल करण्यात आले. तथापि सदर रिट पिटीशन दि.-१९.११.२००५ च्या निर्णयाद्वारे खारीज करण्यात आले. सदर निर्णयाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात अपील दाखल करण्यास कोणताही वाव नसल्याने सदर न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करावी, तसेच सदर न्यायालयीन प्रकरणी प्रत्येक टप्प्यावर करण्यात आलेल्या विलंब व हलगर्जीपणाबाबत संबंधिताविरुध्द जबाबदारी निश्चित करावी,असे अभिप्राय विधी व न्यायविभाग,औरंगाबाद यांनी दिले. सदर प्रकरणी न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी श्री.सपकाळ यांना न्यायनिर्णयानुसार दि-२४.३.१९८३ पासून सेवासातत्यासह 'मजूर' पदी रोजंदारी आस्थापनेवर सेवेत पुनर्स्थापित करुन सुमारे रु.४,३०,४१४/- (चार लक्ष तीस हजार चारशे चौदा फक्त) इतकी थकबाकी अदा करण्याच्या प्रस्ताव न्यायालयीन प्रकरणी गठित करण्यात आलेल्या सचिव समितीच्या दि. २७/६/२००८ रोजीच्या बैठकीत विचारार्थ ठेवण्यात आला होता. तथापि सदर प्रस्ताव सचिव समितीने अमान्य केला व मा. उच्च न्यायालयाच्या उपरोक्त दि. २१/११/२००५ च्या निर्णयाविरुद्ध मा. सर्वोच्च न्यायालयात एस.एल.पी. दाखल करण्यात यावा, असे निर्देश मा. सचिव समितीने दिले. त्यानुसार शासनातर्फे मा. सर्वोच्च न्यायालयात एस.एल.पी. क्र.८०६/२००८ दाखल करण्यात आले. तथापि सदर एस.एल.पी.दि. १७/११/२००८ च्या न्यायनिर्णयान्वये विलंबाच्या कारणास्तव फेटाळण्यात आले. श्री.सपकाळ यांना न्यायनिर्णयानुसार दि.२४.३.१९८३ पासून सेवासातत्यासह 'मजूर' पदी रोजंदारी आस्थापनेवर सेवेत पुनर्स्थापित करुन सुमारे रु.४,३०,४१४/- (रु.चार लक्ष तीस हजार चारशे

चौदा) इतकी थकबाकी अदा करण्याच्या प्रस्तावास दि.०८/०५/२००९ रोजी झालेल्या सचिव समितीच्या बैठकीत सदर न्यायालयीन प्रकरणी घडलेल्या अनियमिततेस जबाबदार अधिकारी/ कर्मचाऱ्यांविरुध्द शिस्तभंग कार्यवाही करण्याच्या अटीच्या अधिन राहून सचिव समितीने मान्यता दिली. त्यानुसार श्री.सपकाळ, मजूर पदी कार्यरत आहेत. सद्यस्थितीत श्री.सपकाळ यांचे कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही. श्री.सपकाळ यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव उपरोक्त पत्रान्वये क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी शासनास सादर केलेला आहे. न्यायनिर्णयानुसार श्री.सपकाळ यांना दि.-२४.३.१९८३ पासून सेवासातत्यासह 'मजूर' पदी रोजंदारी आस्थापनेवर सेवेत पुनर्स्थापित केलेले असून दिनांक-२४.०३.१९८३ पासून ५ वर्षानंतर दिनांक-२४.३.१९८८ पासून रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर 'मजूर'पदी घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

अधिक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ अंतर्गत श्री.सुभाष नारायण सपकाळ,मजूर ,यांना त्यांच्या नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.सुभाष नारायण सपकाळ | रोजंदारी | मजूर २४/०३/१९८३ | २४/०३/१९८८ | मजूर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री.सपकाळ ,यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४. अधिक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तिशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला

रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५. श्री.सपकाळ,यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी आणि त्यांच्या थकबाकीची परिगणना त्यानुसार करावी. सदर थकबाकीपैकी दि.- ३१ ऑगस्ट २००० पुर्वीची रक्कम दहा वार्षिक समान हफ्त्यात भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करावी. जमा केलेल्या रकमेस ३ वर्षे पुर्ण झाल्यानंतर ती रक्कम आहरणासाठी पात्र राहील. दि.३१ ऑगस्ट २००० नंतरची थकबाकीची रक्कम रोखीने व धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी. परंतू सदर रकमेवर भविष्य निर्वाह निधीशी सबधित व्याज वगळता अन्य कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचा-याकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही, अश्याप्रकारचे प्रतिज्ञापत्र लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. या आदेशान्वये रूपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०१११००५१२०५४३००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
अधिक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ
कार्यकारी अभियंता, बीड पाटबंधारे विभाग, बीड.
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ